जिल्हा रुग्णालय, ठाणे येथील स्थलांतरीत करावयाच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२२/ प्र.क्र.२९३/ आरोग्य-३अ

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २१ एप्रिल, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक. प्रशामा-२०२१ /प्र.क्र.१७६ /आरोग्य-३अ, दिनांक ०४.०३.२०२२

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/टे.६/जिरुठाणेस्थलांतरितनविकामे /१८२२६-२२७ दिनांक ०२.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ०१ येथील दिनांक ०४ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे येथे ९०० खाटांचे जिल्हा रुग्णालय, संदर्भ सेवा रुग्णालय व परिचारिका प्रशिक्षण केंद्र आणि वसतीगृह इमारत बांधकामाचे रु. ५२७,४१,१५,०४८/- ( रुपये पाचशे सत्तावीस कोटी, एकेचाळिस लक्ष, पंधरा हजार, अठ्ठेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. आता सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ०२ येथील दि. ०२.११.२०२२ च्या पत्रान्वये, जिल्हा रुग्णालय, ठाणे एकूण ९०० खाटांचे रुग्णालयाचे नवीन बांधकाम करण्याकरीता जुन्या अस्तित्वातील रुग्णालय/ वसतीगृहाच्या इमारती पाडून बांधकाम करावे लागणार आहे. तरी सुपर स्पेशालिटी रुग्णालयाचे बांधकाम करताना काही कक्ष स्थलांतरीत करावे लागणार असल्याने बांधकाम करताना पर्यायी व्यवस्था म्हणून रुग्णालयातील कार्यरत कक्ष जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील अपघात विभाग इमारत (टीसीयु), ॲन्सिलरी इमारत व रिकाम्या जागी शेड करुन काही कक्ष कार्यान्वित करावयाचे आहेत. दिनांक २२.०८.२०२२ रोजी मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अध्यक्षतेखाली

जिल्हा रुग्णालय, ठाणे च्या बांधकामाबाबत बैठक घेण्यात आली असून सदर बैठकीमध्ये तात्काळ ठाणे जिल्हा रुग्णालयाचे बांधकाम करण्याकरीता इमारत खाली करण्याचे आदेश देण्यात आलेले आहेत.

त्यानुसार जिल्हा रुग्णालय, ठाणे येथील इमारत व परिसरात रिकाम्या जागेत स्थलांतरीत करुन नव्याने करावयाच्या कामाचे अंदाजपत्रक मान्यतेकरीता सादर केलेले आहे. सदर कामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक १, ठाणे यांनी तयार केलेले आहे. तसेच अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे, जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे यांनी साक्षांकित केले आहे. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी सदर अंदाजपत्रकास तांत्रीक मान्यता प्रदान केलेली आहे. सदर अंदाजपत्रक हे सन २०२२-२०२३ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदरहू अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा आरोग्य सेवा आयुक्तालयाचा उपरोक्त प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

जिल्हा रुग्णालय, ठाणे येथील स्थलांतरीत करावयाच्या कामाचे रुपये ७,१२,४१,४४०/- (रुपये सात कोटी, बारा लक्ष, एक्केचाळीस हजार, चारशे चाळीस फक्त) इतक्या रक्कमेस खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कामाचे नांव | रक्कम |
|---|---|---|
| १. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील ॲन्सीलरी इमारतीमधील पहिल्या मजल्यावर जिल्हा शल्य चिकित्सक यांचे दालन, प्रतिक्षा कक्ष व इतर अनुषंगिक कामे करणे. | रु. ५३,७३,०४५/- |
| २. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील ॲन्सीलरी इमारतीमधील तळ मजल्यावरील स्वयंपाकगृह विभाग स्थलांतर करुन नव्याने तयार करणे. | रु.५०,२५,०११/- |

| | | |
|---|---|---|
| ३. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील ॲन्सीलरी इमारतीमधील तळ मजल्यावरील प्रशासकीय विभाग स्थलांतर करुन नव्याने तयार करणे. | रु. ६२,५१,२१४/- |
| ४. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील ॲन्सीलरी इमारतीवरील स्टेरेसवर शेड तयार करुन विविध बाह्यरुग्ण सेवा कक्ष तयार करणे. | रु. ७५,८५,४१५/- |
| ५. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील शवागृह इमारती शेजारी नविन कॅबीन तयार करणे. | रु. १०,९०,५३१/- |
| ६. | जिल्हा रुग्णालय, ठाणे आवारातील शवागृह इमारती शेजारी रिकाम्या जागेवर नियमित बाह्यरुग्ण सेवा, प्रतिक्षा कक्ष आणि शौचालय करीता मोठे शेड तयार करणे. | रु. २,२६,८७,१८५/- |
| ७. | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील रिकाम्या जागेवर नियमित बाह्यरुग्णसेवा, प्रतिक्षा कक्ष आणि शौचालय करीता मोठे शेड तयार करणे. | रु. २,३२,२९,०३९/- |
| | एकूण | रु. ७,१२,४१,४४०/- |

**सदर कामास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-**

१) सदर कामाचे सविस्तर अंदाजपत्रक व आराखडयास संबंधित मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांची मान्यता घेण्यात यावी.

२) काम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या-त्या क्षेत्राच्या

सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

५) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि. ०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) नियोजित जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

९) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

१०) सदर काम मंजूर रक्कमेत पुर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदर काम उपलब्ध निधी मधून करण्यात यावे.

३. सदर कामांवरील खर्च मुख्यलेखाशिर्ष "४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य ), ११० -रुग्णालये व दवाखाने, (०१) (अ) - पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना-इमारती, (००) (०१)- मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा...

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४(१) अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२०१७५५१५५४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.04.21 18:53:23 +05'30'

( अ. मा. आत्राम)
सह सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.

२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई

५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.

६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.

७. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.

८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे

९. जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे

१०.जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

१२.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.निवडनस्ती ( आरोग्य-आ३अ ).